छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका येथे कार्यरत असलेल्या दैनिक वेतनावरील ३ कर्मचा-यांचे महानगरपालिकेतील मंजूर व रिक्त पदावर समावेशन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-औमपा-२०१९/प्र.क्र.३१/नवि-२४**
४ था मजला (मुख्य इमारत), मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
राजगुरू हुतात्मा चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २० ऑगस्ट, २०२४

**वाचा:-** १) शासन निर्णय, नगर विकास विभाग,क्र.एमसीओ-२०१८/प्र.क्र.१२२/नवि-१४, दि.५.२.२०१९
२) समक्रमांक शासन निर्णय, नगर विकास विभाग, दि.२८.९.२०२०
३) आयुक्त, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका यांचे पत्र दि.११.३.२०२४.

**प्रस्तावना:-**

राज्यातील विविध नगरपरिषदा/ नगरपंचायतीमधील दिनांक ११.३.१९९३ ते दिनांक २७.३.२००० या कालावधीत नियुक्ती होवून कार्यरत असलेल्या रोजंदारी कर्मचाऱ्यांचे समावेशन करण्याबाबत मा. मंत्रीमंडळाने निर्णय घेतला असून, त्याबाबतचे आदेश संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहे.

२. दिनांक १०.३.१९९३ पूर्वीचे गट-क मधील ३ कर्मचारी व दिनांक ११.३.१९९३ ते दिनांक २७.३.२००० या कालावधीत नियुक्त झालेल्या गट-क मधील ५१ कर्मचारी असे एकूण गट-क संवर्गातील ५४ तसेच दिनांक १०.३.१९९३ पूर्वीचे गट-ड मधील १ कर्मचारी व दिनांक ११.३.१९९३ ते दिनांक २७.३.२००० या कालावधीत नियुक्त झालेल्या गट-ड मधील १३५ कर्मचारी असे एकूण गट-ड संवर्गातील १३६ असे एकूण १९० दैनिक वेतनावरील कार्यरत कर्मचाऱ्यांपैकी ३६ कर्मचाऱ्यांचे आकृतीबंधातील मंजूर व रिक्त पदांवर व उर्वरित १५४ कर्मचाऱ्यांचे अधिसंख्य पदावर संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये महानगरपालिकेच्या सेवेत समावेशन करण्यात आले आहे.

३. दि.२७.३.२००० पूर्वी नियुक्ती असलेले महानगरपालिकेतील श्री चंद्रमणी गवई, चौकीदार, श्री विजय गायकवाड, चौकीदार, श्री आयुब खाँ सांडू खाँ, चौकीदार यांची दैनिक वेतनावरील नियुक्ती २७.३.२००० पूर्वीची असल्याने त्यांना छत्रपती संभाजीनगर महानगरपालिकेच्या आस्थापनेवर रिक्त असलेल्या उपलब्ध पदावर समावेशन करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव आयुक्त, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका यांनी संदर्भाधीन पत्र क्र.३ अन्वये शासनास सादर केला आहे.

४. संदर्भ क्र.१ येथील दैनिक वेतनावरील कर्मचाऱ्यांच्या समावेशनाबाबत घेण्यात आलेला शासन निर्णय व त्यानुसार आयुक्त तथा प्रशासक, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका यांनी संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव विचारात घेता, दि.२७.३.२००० पूर्वी दैनिक वेतनावर नियुक्त असलेले महानगरपालिकेतील श्री चंद्रमणी गवई, श्री विजय गायकवाड, श्री आयुब खाँ सांडू खाँ यांचे महानगरपालिकेच्या सेवेत चौकीदार या मंजूर व रिक्त पदांवर समावेशन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आयुक्त तथा प्रशासक, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका यांनी संदर्भ क्र.३ येथील शासन पत्रान्वये दि.२७.३.२००० पूर्वी दैनिक वेतनावर नियुक्त असलेले महानगरपालिकेतील श्री.चंद्रमणी गवई, श्री विजय गायकवाड, श्री आयुब खाँ सांडू खाँ यांचे महानगरपालिकेतील चौकीदार या मंजूर व रिक्त पदांवर समावेशन करण्याबाबत खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

०२. अटी व शर्ती:-

१. श्री चंद्रमणी गवई, श्री विजय गायकवाड, श्री आयुब खाँ सांडू खाँ या दैनिक वेतनावरील कर्मचाऱ्यांचे छत्रपती संभाजीनगर महानगरपालिकेतील आकृतीबंधातील चौकीदार या मंजूर व रिक्त पदांवर समावेशन करण्यात यावे.
२. समावेशनाच्या दिनांकापासून संबंधित कर्मचाऱ्यांना सेवाजेष्ठता, निवृत्तीवेतन इत्यादि विषयक लाभ अनुज्ञेय राहतील.
३. समावेशनामुळे त्यांना पूर्वीच्या सेवा कालावधीतील वेतन, भत्ते व अन्य अनुषंगिक वित्तीय लाभ यांची थकबाकी अनुज्ञेय असणार नाही.
४. सदरची मंजुरी देताना शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र.संकीर्ण १००५/वर्गीकरण/ प्र.क्र.३७९/०५/नवि-२४, दिनांक ४.५.२००६ मधील ३५% आस्थापना खर्चाची बाब "विशेष बाब" म्हणून शिथील करण्यात येत आहे.
५. पुढील आर्थिक वर्षात महानगरपालिकेचा आस्थापना खर्च ३५% च्या मर्यादेत येण्याच्या अनुषंगाने आवश्यक त्या उपाययोजना कराव्यात. त्याची जबाबदारी आयुक्त, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका यांची राहिल.
६. संबंधित दैनिक वेतनावरील कर्मचाऱ्यांच्या समावेशनानंतर त्यांच्या वेतनाकरीता शासनाकडून कोणताही निधी महानगरपालिकेस मंजूर करण्यात येणार नाही.
७. समावेशन करण्यात आलेल्या सर्व दैनिक वेतनावरील नियमित सेवा सर्वप्रयोजनार्थ त्यांच्या समावेशनाच्या दिनांकापासून ग्राह्य धरण्यात यावी तसेच संबंधित दैनिक वेतनावरील कर्मचाऱ्यांनी कोणत्याही न्यायालयात दावा दाखल केला असल्यास तो बिनशर्त मागे घेण्यात यावा. छत्रपती संभाजीनगर महानगरपालिकेने समावेशनाचे आदेश निर्गमित करण्यापूर्वी उक्त दोन्ही बाबींसंदर्भात संबंधित कर्मचाऱ्यांकडून बंधपत्र घेण्यात यावे व खातरजमा करावी.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०८२०१७१४५१४४२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

JAYANT VASANT WANI

Digitally signed by JAYANT VASANT WANI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT,
2.5.4.20=ed8411d02826988b56bb8a80c92781268bc4b9d63f894022804b55bd1cea9847, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=BFF25E350EA9446CC7F3B43987F8FFE247E43E10915A7723E889FCC11E2F43EB, cn=JAYANT VASANT WANI
Date: 2024.08.20 17:29:50 +05'30'

**( जयंत वाणी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.मा.मुख्यमंत्री महोदयांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२.आयुक्त तथा प्रशासक, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका, छत्रपती संभाजीनगर.
३.उप सचिव (नवि-२४) यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४.प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
५.निवड नस्ती, नवि-२४.